**श्री छत्रपती शिवाजी महाराज वस्तुसंग्रहालय, सातारा येथील नवीन इमारतीत आतील भागातील स्थापत्य कामास वित्तीय मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संग्रह-२०१९/प्र.क्र.८९/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. संग्रह-२०१९/ प्र.क्र.८९/सां.का.३, दि.०५.०७.२०१९

२) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे पत्र क्र.संग्रह-सातारा/ स्थापत्यकाम/२०२४/३०७६, दिनांक १६.१०.२०२४.

**प्रस्तावना :-**

श्री छत्रपती शिवाजी महाराज वस्तुसंग्रहालय, सातारा या संग्रहालयाच्या नवीन इमारतीत आतील भागातील स्थापत्य कामाच्या रु.२,३६,२३,९१२/- इतक्या रकमेस उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता व त्यापैकी रु.९१,०१,०००/- इतकी रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाकडे ठेव अंशदान स्वरुपात ठेवण्यास वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदर प्रयोजनार्थ रु.७८,४३,१२८/- इतकी रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाकडे ठेव अंशदान स्वरुपात ठेवण्याकरीता वित्तीय मान्यता देण्याची विनंती संचालनालयाने त्यांचा उपर्निर्दिष्ट क्र.२ अन्वये केली आहे. त्यानुसार सदर स्थापत्य कामाच्या रु. ७८,४३,१२८/- इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री छत्रपती शिवाजी महाराज वस्तुसंग्रहालय, सातारा या संग्रहालयाच्या नवीन इमारतीत आतील भागातील स्थापत्य कामाच्या रु.७८,४३,१२८/- (अक्षरी रुपये अठ्ठ्याहत्तर लक्ष त्रेचाळीस हजार एकशे अठ्ठावीस मात्र) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरची रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाकडे ठेव अंशदान स्वरुपात (Deposite Contribution Work) ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयास नियोजन विभाग अनौ.सं.क्र.४२/का-१४४३, दि. २७ जानेवारी, २०२५ अन्वये व वित्त विभाग अनौ.सं.क्र.९८.२०२५/व्यय-१५, दि. ०७ फेब्रुवारी, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, कला व संस्कृती (०१) (०२) विविध वस्तूसंग्रहालयातील विशिष्ट विभागाची पुनर्रचना व विकास (राज्य) (कार्यक्रम) (२२०५ १३२९) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०२२७१२४६४४४७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA
MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.02.27 12:48:10 +05'30'

**( नंदा राऊत )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहाय्यक अभिरक्षक, श्री छत्रपती शिवाजी महाराज वस्तुसंग्रहालय, सातारा.
६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती, सां.का.३.